**तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अखत्यारीत कार्यरत शासकीय तंत्र निकेतने, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये व व्यवसाय अभ्यासक्रम राबविणा-या तत्सम संस्थांतील कर्मशाळा व प्रयोगशाळेत कार्यरत सहाय्यकारी पदांची कर्तव्ये व जबाबदा-या....**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन शुद्धीपत्रक क्रमांकः पदनामे-२०१२/(४५/१२)/तां.शि-२

मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ सप्टेंबर, २०१८

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांक : उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक पदनामे-२०१२/(४५/१२)/तां.शि-२, दिनांक ०१ जून, २०१२

२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांचे क्र. १२(१)/आस्था/२०१८/१३६२, दिनांक ०४ जुलै, २०१८ चे पत्र.

**शुद्धिपत्रक :**

तंत्रशिक्षण संचालनालयांतर्गत असलेल्या शासकीय तंत्रनिकेतने, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये व व्यावसायिक अभ्यासक्रम राबविणा-या तत्सम संस्थांत कार्यरत तांत्रिक सहाय्यकारी पदांचे जातीवाचक पदनामे बदलून सदर संवर्गाची पुनर्रचना करण्याच्या दृष्टीने शासकीय तथा अशासकीय अनुदानित संस्थांचा सर्वंकष आढावा घेऊन संस्थांमधील प्रयोगशाळेत कार्यरत सहाय्यकारी पदांची कर्तव्ये व जबाबदा-या शासन निर्णय क्रमांक : पदनामे-२०१२/(४५/१२)/तांशि-२, दिनांक ०१.०६.२०१२ अन्वये निर्धारीत करण्यात आलेल्या आहेत.

सदर शासन निर्णयामधील (ब) येथे कर्मशाळा व प्रयोगशाळेतील तांत्रिक सहाय्यकारी पदे (वर्ग-३) ची एकत्रित पदे नमूद करण्यात आलेली आहेत. त्यापैकी, सदर पदांना सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार रु. ५२००-२०२०० ग्रेड पे रु. २४०० अशी वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली असून मुद्रण निदेशक आणि आरेखक या पदांना रु. ९३००-३४८००+ग्रेड पे ४३०० अशी वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामधील (ब) येथे नमूद करण्यात आलेल्या पदांपैकी मुद्रण निदेशक या पदाच्या कर्तव्ये व जबाबदा-या या अन्य तांत्रिक सहाय्यकारी पदांच्या कर्तव्ये व जबाबदा-या यांपेक्षा भिन्न असल्याने आणि आरेखक हे पद विभागाच्या क्र. टिईडी-८००१/(३२१/०१-भाग-२)/तांशि-५, दिनांक १४.०१.२००३ अन्वये व्यपगत करण्यात आलेले असल्याने सदर पदे संदर्भाधीन शासन निर्णयामधील मुद्दा (ब) येथून वगळण्यात येत आहेत. तसेच, संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये “इ. मुद्रण निदेशक : कर्तव्ये व जबाबदा-या” या मुद्याचा नव्याने समावेश करून त्याअंतर्गत खाली नमूद कर्तव्ये व जबाबदा-या समाविष्ट करण्यात येत आहेत :

१.कर्मशाळेतील/विभागातील कनिष्ठ तांत्रिक/अतांत्रिक/गट-ड मधील कर्मचा-यांच्या कामकाजावर देखरेख व आवश्यकतेनुसार प्रत्यक्ष सहभाग.
२.यंत्रसामुग्री व उपकरणांची सुरक्षितता व देखभाल संबंधीत नियम विद्यार्थ्यांना समजाविणे.
३. प्रात्यक्षिकांसाठी आवश्यक खर्चीक साहित्याची मागणी करून वेळेत उपलब्ध होणेबाबत दक्षता घेणे.
४. विद्यार्थ्यांच्या प्रात्यक्षिकांचे रेकॉड्‌र्स मुल्यांकनासाठी तयार करून संबंधीत शिक्षकाकडे सादर करणे.
५. प्रात्यक्षिकांच्या अनुषंगाने येणारी सर्व संबंधीत कामे.
६. अद्ययावत यंत्रसामुग्रीसाठी वरिष्ठांच्या सूचनेनुसार वेळेवेळी प्रशिक्षण पूर्ण करणे.
७. परीक्षेच्या कामकाजात वरिष्ठांच्या निर्देशानुसार काम करणे.
८. वरीष्ठांनी वेळोवेळी सांगितलेली इतर कामे करणे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०९०६१४३३२२०७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Raghunath Katkar

Digitally signed by Anil Raghunath Katkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c3fec0b0f5c05dc9058175992109e62d3f5719b9dfb87a96579dc30c265d67ce,
serialNumber=2356d82c73e8a0c7b6da68b65111972 06b94720842cda576febebf84581fc52a, cn=Anil Raghunath Katkar
Date: 2018.09.24 16:24:10 +05'30'

**(अनिल र. काटकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, सर्व विभागीय तंत्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
३. प्राचार्य, सर्व शासकीय तंत्रनिकेतने व तत्सम संस्था (संचालनालयामार्फत)
४. प्राचार्य, सर्व शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये व तत्सम संस्था (संचालनालयामार्फत)
५. निवड नस्ती- तांशि-२